महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेसाठी “सेवानिवृत्त उप अभियंता” यांची कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.३७३/बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १६ जुलै २०२४

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८.१०.२०१५.

२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** संकिर्ण २७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७.१२.२०१६.

३) **शासन आदेश, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२०/प्र.क्र.३०७/बांध-४, दिनांक १५.०९.२०२१.

४) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६.०१.२०२२.

५) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.७४/बांध-४, दिनांक १९.०४.२०२३.

६) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.३७३/बांध-४, दिनांक २०.०९.२०२३.

७) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.७४/बांध-४, दिनांक १८.१०.२०२३.

८) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.७४/बांध-४, दिनांक २७.१०.२०२३.

**प्रस्तावना :**

ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ६,७ व ८ येथील शासन आदेशान्वये, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या अंमलबजावणीसाठी व महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेच्या कामाच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी स्वरूपात तात्पुरती नेमणुक ११ महिन्यांच्या कालावधीकरिता करार पद्धतीने करण्यात आली होती. सदर सेवानिवृत्त उप अभियंता यांचा मुळ नियुक्तीपासूनचा एकूण कालावधी तीन वर्षापेक्षा अधिक असणार नाही या अटीच्या अधीन राहून प्रस्तुत सेवा निवृत्त उप अभियंता यांना तात्पुरती ०३ महिन्यांसाठी पुनर्नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन आदेश:

ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक ६,७ व ८ येथील आदेशान्वये, सेवानिवृत्त उप अभियंता यांचा कंत्राटी तत्वावर **सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १७ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील व ग्राम विकास विभागाच्या दिनांक १५ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन आदेशातील अटी व शर्तींच्या अधीन राहून** खालील सेवानिवृत्त उप अभियंता यांच्या कंत्राटी तत्वावरील नेमणुकीमध्ये तांत्रिक खंड देऊन त्यांची कंत्राटी तत्वावरील सेवानिवृत्त उप अभियंता म्हणून त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये नमुद दिनांकापासून ०३ महिन्यांच्या कालावधीकरिता करार पद्धतीने पुनर्नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सेवानिवृत्त उप अभियंत्याचे नाव | कंत्राटी तत्वावर नेमणुक केलेले कार्यालय | नियुक्ती कालावधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.लियाकत अ. काझी | राज्य गुणवत्ता समन्वयक कार्यालय, पुणे | दि.१०.०७.२०२४ ते ०९.१०.२०२४ |
| २ | श्री.विश्वास न. पाटील | अधिक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक | दि.१०.०७.२०२४ ते ०९.१०.२०२४ |
| ३ | श्री.केशव ग. राजगडकर | कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) कार्यालय, जिल्हा चंद्रपूर | दि.१०.०७.२०२४ ते ०९.१०.२०२४ |
| ४ | श्री.अरविंद भा. पाचपोर | कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) कार्यालय, जिल्हा अकोला | दि.१०.०७.२०२४ ते ०९.१०.२०२४ |
| ५ | श्री.राज कि. जगताप | अधिक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती. | दि.१०.०७.२०२४ ते ०९.१०.२०२४ |

**०२.** सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी पदावरील नियुक्तीच्या कालावधीत कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच अटी व शर्ती उक्त वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक १५ सप्टेंबर, २०२१ येथील आदेशामध्ये नमुद केल्याप्रमाणे लागू राहतील.

**०३.** सेवानिवृत्त उप अभियंता यांचे मासिक परिश्रमिक व भत्ते सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक १७ डिसेंबर, २०१६ मधील शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहतील.

**०४.** या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे (सीआरसी-५०५४ ५१५३) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

०५. हा शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २७१५/ प्र.क्र.१००/१३, दिनांक १७.१२.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०७१६११४७१५६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.07.16 18:58:46 +05'30'

(प्रशांत पाटील)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/( लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
३) मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
४) अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, नाशिक विभाग, नाशिक.
५) राज्य गुणवत्ता समन्वयक (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जळगाव.
१०) संबंधित सेवानिवृत्त उप अभियंता (संबंधित अधीक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो. यांचे मार्फत)
११) निवड नस्ती, (कार्यासन बांधकाम-४), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.